**सार्वजनिक बांधकाम उपविभाग, भिंगारी (मुख्यालय पनवेल) हे उपविभागीय कार्यालय कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २ ठाणे, यांचेकडे वर्ग करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.०६/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- २९ नोव्हेंबर, २०२१**

**संदर्भ**:- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे क्र.मु.अ.(को)/ परिमंडळ/१६४, दि. १२ जानेवारी, २०२१ व दि.०६ एप्रिल, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

प्रशासकीय कामकाजाच्या सोयीच्या दृष्टीने सार्वजनिक बांधकाम उपविभाग, भिंगारी (मुख्यालय पनवेल) हा उपविभाग कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, ठाणे यांचेकडे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड अंतर्गत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल अंतर्गत सार्वजनिक बांधकाम उपविभाग, भिंगारी (मुख्यालय पनवेल) हे उपविभागीय कार्यालय खालील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदसंख्येसह अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, ठाणे यांच्याकडे शासनावर कोणतीही अधिकचा आर्थिक भार पडणार नाही या अटींच्या अधीन राहून वर्ग करण्यात शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | शाखा अभियंता | ०५ |
| २ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ०५ |
| ३ | वरीष्ठ लिपिक | ०१ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ०२ |
| ५ | शिपाई | ०२ |
| ६ | चौकीदार | ०१ |
| ७ | वाहन चालक | ०१ |
| | एकूण | १७ |

२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड यांच्या अधिपत्याखालील सार्वजनिक बांधकाम उपविभाग, भिंगारी (मुख्यालय पनवेल) हे कार्यालय वर नमूद अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदसंख्येसह अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, ठाणे यांच्याकडे वर्ग करण्यात येत असल्याने उक्त अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनाविषयक अडचणी उद्भवू नये यास्तव त्यांचे वेतन व भत्ते आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड यांच्या " मागणी क्र.एच-६, २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ००१- संचालन व प्रशासन योजनेत्तर, (०५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड (०५) (०२) कार्यान्वयन, संगणक सांकेतांक-२०५९०९३७, (०१)- वेतन " या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावेत.

तद्नंतर पुढील आर्थिक वर्षापासून (एप्रिल-२०२२ पासून) या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे या कार्यालयाकडून अदा करण्यात यावेत. याकरीता " उप कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, ठाणे " यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११२९१४५१२७१५१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.11.29 14:56:03 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
५. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

६. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. सर्व सह सचिव/ उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण.
१३. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड / ठाणे.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल.
१५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, ठाणे.
१६. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, पनवेल / ठाणे.
१७. कार्यासन अर्थसंकल्प-३/ सेवा-२/सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यासन प्रशासन-१ (निवडनस्ती), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.